**सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयाकरिता लिपिक-टंकलेखक-५ व शिपाई-५ अशा एकूण १० अतिरिक्त कर्मचा-यांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय: सवऔ-२१२३/११४८/प्र.क्र.८७/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई: ४०००३२.
दिनांक: ०२ एप्रिल, २०२४

**वाचा:-** १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण २८१६/प्र.क्र१९१(भाग १)/१६/का.८, दि.१८ एप्रिल, २०२३
२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क., दि. २७एप्रिल, २०२२
३) विधि व न्याय विभाग, शाखा- छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र. आस्था-२०२२/प्र.क्र.०१/१९१०,दि.२६ सप्टेंबर,२०२३

**प्रस्तावना:-**

विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, दि.१८ एप्रिल, २०२३ अन्वये कार्यासन-८ च्या अधिपत्याखालील १३ सरकारी वकील कार्यालयांच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आलेला आहे. सदर सुधारित आकृतीबंधानुसार सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयाकरिता ७९ नियमित पदे व ३८ पदांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. मा. उच्च न्यायालयासाठी बांधण्यात आलेल्या नवीन इमारतीमध्ये कार्यरत झालेल्या फौजदारी न्यायालयांचे व सरकारी वकिलांच्या कार्यालयांचे अंतर जास्त असल्याने आणि कर्मचा-यांची बैठक व प्रकरणे ठेवण्याची व्यवस्था ही जुन्या इमारतीतच असल्याने या कार्यालयाकरिता अतिरिक्त ५ लिपिक-टंकलेखक व ५ शिपाई अशा एकूण १० अतिरिक्त कर्मचा-यांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव विधि व न्याय विभाग, शाखा- छत्रपती संभाजीनगर कार्यालयाने संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये सादर केलेला होता. सदर प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला. त्यानुषंगाने सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयाकरिता ५ लिपिक-टंकलेखक व ५ शिपाई अशा एकूण १० अतिरिक्त कर्मचा-यांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास, वित्त विभाग, शासन निर्णय, दि.०९ जून, २०१७ अन्वये गठित उपसमितीची चक्रीय पद्धतीने मान्यता प्राप्त झालेली आहे.

**शासन निर्णय:-**

उपसमितीने दिलेल्या मान्यतेनुसार, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयाकरिता ५ लिपिक-टंकलेखक व ५ शिपाई अशा एकूण १० अतिरिक्त कर्मचा-यांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. बाहययंत्रणेद्वारे सेवा घेताना वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच, बाहययंत्रणेकडून सेवा उपलब्ध करुन घेताना प्रचलित कायदयाचा भंग होणार नाही याची काळजी कार्यालय प्रमुखांनी घ्यावी.

३. यावर होणारा खर्च,"मागणी क्र.जे-०१, लेखाशीर्ष २०१४, न्यायदान, ११४, विधि सल्लागार व समुपदेशी (००) (०१) विधि सल्लागार व समुपदेशी, (शहर अधिकारी) (दत्तमत) (अनिवार्य) १०-कंत्राटी सेवा (२०१४ ०२९९)", खाली खर्ची टाकून प्रतिवर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय दि. ०९.०६.२०१७ अन्वये गठित, अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, यांच्या उपसमितीने चक्रीय पद्धतीने दिलेल्या मान्यतेनुसार व वित्त विभागाच्या अनौ. स. क्र. ११३/आ. पु. क., दि. २६.०२.२०२४ अनुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून, त्याचा सांकेतांक क्र.२०२४०४०२१६१४४७४८१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWATI LOHAR

Digitally signed by SWATI LOHAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=eaef1faf1fb5262ec7b0737903120dfa387867f017650e284f3e90868f26d12d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AB72B061785AE0359686D1C8A0DDB0F52744A155BE1924D6AB3706E1DE7E60EC, cn=SWATI LOHAR
Date: 2024.04.02 16:24:34 +05'30'

**( स्वा.सु.लोहार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
४) सह सचिव, कार्यासन-८, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सह सचिव, विधि व न्याय विभाग, औरंगाबाद.
६) सरकारी वकील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद
७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
८) आस्थापना अधिकारी, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, औरंगाबाद
९) कक्ष अधिकारी, विधि व न्याय विभाग (कार्यासन-२३), मंत्रालय, मुंबई.
१०) कक्ष अधिकारी, (आपुक/व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती (कार्यासन-८).